**संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील श्री.रामचंद्र शामराव कोळी, माळी यांच्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करुन अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२४/प्र.क्र.५३/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.२७ नोव्हेंबर, २०२० व दि.२८ ऑक्टोबर, २०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि. १४ डिसेंबर, २०२२.
४) संचालक, उपवने व उद्याने, मुंबई यांचे क्र.संउवउमुं/आस्था-३/१०५५/२०२४, दि.०१ जुलै, २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील उद्यान अधिक्षक, शासकीय बगीचे, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखाली कार्यालयांतर्गत कार्यरत असलेले श्री.रामचंद्र शामराव कोळी, माळी यांनी अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र जात पडताळणी समितीकडे सादर केले होते. परंतु श्री.रामचंद्र कोळी अनुसूचित जमातीचा दावा पडताळणी समितीसमोर सिद्ध करु शकले नाहीत. त्यामुळे कार्यकारी दंडाधिकारी, कोल्हापूर जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, कोल्हापूर यांनी श्री.रामचंद्र कोळी यांचे जातीचे प्रमाणपत्र रद्द व जप्त केले आहे. तद्नंतर श्री.रामचंद्र कोळी यांनी विशेष मागास प्रवर्गाचे (वि.मा.प्र.) जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेतले होते. त्यामुळे संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी श्री.कोळी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करुन सदर अधिसंख्य पदास मुदतवाढ दिली होती.

अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे अधिकार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३०/०६/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. परंतु संचालक, उपवने व उद्याने, मुंबई यांनी श्री.रामचंद्र कोळी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करुन अधिसंख्य पदास मुदतवाढ दिली होती. त्यामुळे श्री.कोळी यांच्यासाठी शासन स्तरावर अधिसंख्य पद निर्माण करण्याची विनंती संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केली आहे. त्यानुसार श्री.रामचंद्र कोळी यांच्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील उद्यान अधिक्षक, शासकीय बगीचे, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेले श्री.रामचंद्र शामराव कोळी, माळी यांच्याकरीता सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१/१२/२०१९ मधील तरतुदीनुसार त्यांच्याकरीता दि.३१/१२/२०१९ पासून अधिसंख्य पद निर्माण करुन ११ महिने (दि.३१/१२/२०१९ ते दि.३०/११/२०२० पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

श्री.रामचंद्र शामराव कोळी यांच्या अधिसंख्य पदावरील कालावधी दि.३०/११/२०२० रोजी संपुष्टात आल्यामुळे त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२७/११/२०२० अन्वये पुढील ११ महिने (दि.०१/१२/२०२० ते दि.३१/१०/२०२१ पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२८/१०/२०२१ अन्वये पुढील ११ महिने (दि.०१/११/२०२१ ते दि.३०/०९/२०२२ पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत व पुन:श्च सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२८/१०/२०२१ अन्वये (दि.०१/१०/२०२२ ते दि.३१/०८/२०२३ पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ अन्वये ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देवून पुढील ११ महिने (दि.०२/०९/२०२३ ते दि.०१/०८/२०२४ पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत व पुन:श्च सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ अन्वये (दि.०३/०८/२०२४ ते दि.०२/०७/२०२५ पर्यंत) किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत कार्योत्तर मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. श्री.रामचंद्र शामराव कोळी, माळी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यापुर्वी त्यांना जेवढे मासिक वेतन व भत्ते मिळत होते, तेवढे वेतन व भत्ते त्यांना पुढील आदेश होईपर्यंत देण्यात येईल.

**३.** अधिसंख्य पदावर मुदतवाढ देण्यात आलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांच्या अधिसंख्य पदाची मुदत संपुष्टात आल्यानंतर किमान १५ दिवसात मुदतवाढीचा प्रस्ताव शासनास सादर करण्याची दक्षता संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाने घ्यावी.

**४.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१/१२/२०१९, दि.३०/०६/२०२०, दि.२७/११/२०२० व दि.२८/१०/२०२१, दि.१४/१२/२०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८०२१२०११७२६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.08.02 12:16:16 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) उद्यान अधीक्षक, शासकीय उद्याने, कोल्हापूर.
३) सहाय्यक संचालक, उपवने व उद्याने, पुणे.
४) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
८) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.